“आदर्श राज्य शिक्षक पुरस्कार”
**सन २०१२-१३ या वर्षापासून पुरस्काराच्या रकमेत वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरस्का-२६१२/(प्र.क्र.१८२/१३)/समन्वय**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १६ फेब्रुवारी, २०१५.

वाचा -

**१) शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक : राशिपु-२०१०/(१९५/१०)/समन्वय, दि.२१ ऑक्टोबर, २०१०.**
**२) शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक : राशिपु-०४१३/प्र.क्र.४० (भाग-२) /समन्वय, दि.१० सप्टेंबर, २०१३.**
**३) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे पत्र क्रमांक : उशिसं/पुरस्कार/वाढीव खर्च/प्रशा-३/९४७३, दि.२४ डिसेंबर, २०१३.**

प्रस्तावना -

आदर्श राज्य शिक्षक पुरस्कार प्राप्त प्रत्येक शिक्षकास रु.१०,०००/- ( रुपये दहा हजार फक्त ) इतक्या रोख रकमेचे पारितोषिक संदर्भाधिन शासन निर्णय दि.२१ ऑक्टोबर, २०१० अन्वये मंजूर करण्यात आले आहे.

२. सन २०१२-१३ या वर्षाकरीता आदर्श राज्य शिक्षक पुरस्काराराथींची नांवे संदर्भाधिन शासन निर्णय दि.१०/०९/२०१३ अन्वये घोषित करण्यात आली आहे. सदर राज्य शिक्षक पुरस्काराराथींना देण्यात येणारी पुरस्काराची रक्कम सन २०१२-१३ या वर्षापासून रु.१०,०००/- वरुन रु.२५,०००/- प्रत्येकी याप्रमाणे वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय —**

सन २०१२-१३ पासून आदर्श राज्य शिक्षक पुरस्कार प्राप्त प्रत्येक शिक्षकास रु.२५,०००/- ( रुपये पंचवीस हजार फक्त ) इतक्या रोख रकमेचे पारितोषिक देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. त्याचप्रमाणे शासन निर्णय दि.१०/०९/२०१३ अन्वये घोषित करण्यात आलेल्या सन २०१२-१३ च्या राज्य शिक्षक पुरस्काराराथींना देण्यात येणारी फरकाची रक्कम प्रति पुरस्काराराथी रु.१५,०००/- याप्रमाणे रक्कम अदा करण्यास तसेच विभागून देण्यात आलेल्या दोन राज्य शिक्षक पुरस्काराराथींना

प्रति पुरस्काराराथी रु.२०,०००/- याप्रमाणे फरकाची रक्कम अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. यासाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. :-

लेखाशिर्ष - " मागणी क्र.डब्ल्यू-४, २२०५-कला व संस्कृती, ८००-इतर खर्च ( ०१ ) समित्या व समारंभ ( ०१ ) ( ०१ ) समित्या व समारंभ -०५ बक्षिसे ( २२०५ ०४५८ ) "

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१०/व्यय-५, दि.२८/०५/२०१४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१६१७२६०१४१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2015.02.16 17:36:08 +05'30'

**( का.रा.पिळणकर )**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव ( उच्च व तंत्र शिक्षण विभाग ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे ( ५ प्रती ).
६. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ( ५ प्रती ).
७. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ( ५ प्रती )
८. संचालक, प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ( ५ प्रती )
९. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ( ५ प्रती ).
१०.कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे

११.सर्व विभागीय शिक्षण सह संचालक, उच्च शिक्षण.

१२.सर्व विभागीय शिक्षण सह संचालक, तंत्र शिक्षण.

१३.सर्व विभागीय उप संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण.

१४.महालेखापाल, ( लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता ), महाराष्ट्र - I / II, मुंबई /नागपूर.

१५.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

१६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१७.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

१८. सर्व सह सचिव /उप सचिव /अवर सचिव /कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९. निवडनस्ती.